**प्रकल्पग्रस्तांना शासकीय खर्चाने उपसा सिंचन योजना करुन देण्यापेक्षा प्रकल्पग्रस्तांचे पाणी वापर संस्थेस अग्रक्रमाने पाणी वापराचे हक्क देऊन अशा संस्थांना प्रोत्साहीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१४/(९७/१४)/जसं(आस्था)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २१ मार्च, २०१७.

**वाचा -**

१) जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२ यांचे पत्र क्रमांक संकीर्ण-२०१४/(३७१/२०१४), दि.०७/१०/२०१४
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१४/(२४८/१४)/मोप्र-२, दि.२५/०८/२०१४
३) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक संकीर्ण- २०१४/(९७/१४)/जसं(आस्था), दि. ७ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विविध पाटबंधारे विकास महामंडळांकडील सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव, सिंचन क्षमता, सिंचित क्षेत्र यांची तपासणी करण्याकरिता डॉ. माधवराव चितळे, जलतज्ञ तथा माजी सचिव, केंद्रीय जलसंसाधन मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या अध्यक्षतेखाली विशेष चौकशी समिती नियुक्त करण्यात आली होती. या समितीने त्यांचा अहवाल दि. १.३.२०१४ रोजी मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांना सादर केला. या अहवालावर शासनातर्फे करावयाच्या कार्यवाहीचा मुद्देनिहाय कार्यपालन अहवाल दि.१४.०६.२०१४ रोजी विधीमंडळाच्या दोन्ही सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेला आहे.

सदर समितीने चौकशी अहवालातील प्रकरण क्र.५ मध्ये राज्यातील उपसा सिंचन योजनांचा परामर्श घेतलेला आहे. पाटबंधारे प्रकल्पाचे विस्थापिताकरिता तसेच अवर्षण प्रवण भागास न्याय देण्याच्यादृष्टीने व्यापक सामाजिक दृष्टीकोनातून शासनाने काही उपसा सिंचन योजना हाती घेतल्या. या पैकी अनेक योजना अद्याप पूर्णत: कार्यान्वित झालेल्या नाहीत. तसेच राज्यातील मोठया व मध्यम प्रकल्पाच्या जलशास्त्रासारख्या शाश्वत पाण्यासारखा स्त्रोत असूनही सहकारी / खाजगी उपसा सिंचन योजना कार्यक्षमपणे दीर्घकाळ टिकून राहिल्या नाहीत तसेच सहकाराचा अभाव व आर्थिकदृष्टया असफल झाल्यामुळे योजना बंद पडल्या. तसेच असेही निदर्शनास आले आहे की, ज्या उपसा सिंचन योजनेवर ऊस, द्राक्षे, भाजीपाला, फळबागा, फुलशेती अशी नगदी पीके घेतली जातात अशाच उपसा सिंचन योजना वीज बील भरण्यास व योजनेचा देखभाल दुरुस्ती खर्च पेलण्यास सक्षम ठरतात. या पार्श्वभूमीवर समितीने "प्रकल्पग्रस्तांना शासकीय खर्चाने उपसा सिंचन योजना करुन देण्यापेक्षा त्यांच्या पाणी वापर संस्था स्थापन करुन लहान उपसाव्दारे पाणीपुरवठा करण्यास प्रोत्साहन देणे इष्ट राहील" अशी शिफारस केली आहे. त्या अनुषंगाने दि.७ मार्च,२०१७ रोजी शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केलेला विषयांकित व समक्रमांकित शासन निर्णय याद्वारे निरसित करण्यात येऊन पुढील निर्णय घेणेत येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रकल्पग्रस्तांसाठी यापुढे शासकीय खर्चाने उपसा सिंचन योजना राबविण्यात येऊ नयेत. प्रकल्पग्रस्तांनी पाणी वापर संस्था स्थापन करुन पाणी परवाना मागणी केल्यास अशा प्रकल्पग्रस्तांच्या पाणी वापर संस्थांना पाणी परवाने प्राधान्याने देण्यात यावेत. तसेच अशा पाणी वापर संस्थांना ठिबक योजना राबविण्यासाठीचे अनुदान प्राधान्याने मंजूर करावे व घनमापन पध्दतीने दिल्या जाणा-या पाण्याच्या पाणीपट्टीत ५० टक्के सूट द्यावी.

सदर शासन निर्णय कृषी विभाग तसेच मदत व पुनर्वसन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२२१२४९४४०९२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, serialNumber=293016b5f13cd03f75c9f34c66d956309c8b3cd5faf07931d817577e6116e436, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2017.03.22 12:53:17 +05'30'

**( र.रा.शुक्ला )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (प्र.स.) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग
७. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
८. मुख्य अभियंता (जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. उपसचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. उपसचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपसचिव (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव (मोप्र-१/मोप्र-२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कार्यासन जसं (आस्था) संग्रहार्थ.